जलसंपदा विभागात दिनांक ०२.०४.१९८१ ते दिनांक ३१.१२.१९९४ या कालावधीत तदर्थ नियुक्त्या दिलेल्या पदवीधर कनिष्ठ अभियंता व पदवीकाधारक धारक कनिष्ठ अभियंता ज्यांनी सेवेत असतांना ए.एम.आय.ई किंवा बी.ई पदवी प्राप्त केली आहे अशा अभियंत्यांना सहाय्यक अभियंता श्रेणी -२(यांत्रिकी) गट-ब या संवर्गात समावून घेण्याकरीता महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून घेण्यात येणाऱ्या अर्हता परीक्षेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक :-नियुक्ती -२०१३/(प्र.क्र.६८/२०१३)/आ(स.अ.श्रे.-२)**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

तारीख: ०४ नोव्हेंबर, २०१५

**संदर्भ :**-१) शासन अधिसुचना, जलसंपदा विभाग,क्र.बीसीएस- १०८६/(१६७/८६)(भाग-२)/आ (सं. नि.), दिनांक ०४ एप्रिल, २०१३.

२.महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई यांचे पत्र क्र.३७४(२)(२)(२)/१४९५४/चार दि.३१.१०.२०१५.

**परिपत्रक**

महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा गट-ब मधील सहायक अभियंता श्रेणी-२ (यांत्रिकी) पदाचे सेवाप्रवेश नियम संदर्भिय शासन अधिसुचना दिनांक ०४ एप्रिल, २०१३ अन्वये अधिसुचित झाले आहेत. सदर सेवाप्रवेश नियमातील नियम १० येथे तरतुद केल्याप्रमाणे **दि.०२.०४.१९८१ ते दि.३१.१२.१९९४ या कालावधीत पदवीधर कनिष्ठ अभियंता (वर्ग-३) या पदावर नियुक्त करण्यात आलेल्या उमेदवारांना शासन निर्णय, पाटबंधारे विभाग, क्र. सीडीएस-१५८२/१५८(२१५)/इएसटी-१०, दि. १६.४.१९८४ अन्वये पदवीधर कनिष्ठ अभियंत्याकरिता निर्माण केलेल्या सहायक अभियंता श्रेणी-२ (कनिष्ठ राजपत्रित गट-ब) या संवर्गात महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून तोंडी परीक्षा घेऊन समावेशन करण्याची तरतूद आहे.** त्या तरतुदीनुसार संबंधित अभियंत्यांच्या तोंडी अर्हता परीक्षा घेण्याबाबत महाराष्ट्र लोकसेवा आयोगास विनंती करण्यात आली आहे. त्या अनुषंगाने संबंधित अभियंत्यांचे समावेशन करण्यासाठी शासनाकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावानुसार प्रथम संधी म्हणून आयोगामार्फत मौखिक परीक्षा घेण्यात येत आहे. सदर मौखिक परीक्षेसाठी अनुतीर्ण झालेले अभियंते, सदर परिक्षेला अनुपस्थीत राहिलेले अभियंते आणि

मौखिक परीक्षेचे आवेदनपत्र सादर न केलेले अभियंते अशा अभियंत्याची ही प्रथम संधी म्हणून गृहीत धरण्यात येईल. **तसेच, पदविकाधारक कनिष्ठ अभियंता या गट-क मधील पदावर नियमितरित्या नेमणूक झालेल्या ज्या अभियंत्यांनी शासन सेवेत असताना ए. एम. आय.ई(बी.ई.पदवीशी समकक्ष) किंवा बी.ई. पदवी प्राप्त केली आहे, त्यांना शासन निर्णय, पाटबंधारे विभाग क्र. एसएलएस-२६८१/१२७३/(५००)/इएसटी-८, दि. २९.११.१९८४ मधील तरतुदीनुसार पदविकाधारक अभियंता म्हणून केलेल्या एकूण सेवेपैकी ३/८ सेवेचा लाभ दि.०२.०४.१९८१ ते दि. ३१.१२.१९९४ या कालावधीत देण्यात आलेला आहे अशा व्यक्तींना सदर मौखिक परीक्षा उतीर्ण करावी लागेल.** सदर मौखिक परीक्षा उतीर्ण करण्याकरिता उमेदवारांना तीन संधी देण्यात येतील, सदर तीनही संधीत उतीर्ण न होणाऱ्या उमेदवारांच्या सेवा समाप्त करण्यात येतील. परंतु, अशा उमेदवारांनी कनिष्ठ अभियंता, गट-ब (अराजपत्रित) या (सहायक अभियंता श्रेणी-२ पेक्षा निम्न स्तरावरील) संवर्गात समावेशन करून त्यांची ज्येष्ठता या संवर्गात संबंधित परिक्षेच्या वर्षाच्या ज्येष्ठता यादीत सर्वात शेवटी निश्चित करण्याबाबतचे हमीपत्र दिल्यास त्यांना त्या संवर्गात सामावून घेण्यात येईल.

**उपरोक्तप्रमाणे अभियंत्यांसाठी प्रथम संधी म्हणून महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने सन -२०१५ च्या मौखिक परीक्षेचा कार्यक्रम जाहीर केला आहे.**

२. या संदर्भात संबंधित अभियंत्यांच्या मार्गदर्शनासाठी व कार्यवाहीसाठी पुढील सूचना देण्यात येत आहेत.

२.१ सदर समावेशन परीक्षेसाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडे **ऑन लाईन** अर्ज करणे आवश्यक आहे.

२.२ सर्व उमेदवारांनी स्वत:ची शैक्षणिक पात्रता, वय, जात/ जमात व निवास इत्यादी बाबतच्या नोंदी मूळ कागदपत्रांबरोबर पडताळूनच आयोगास सादर कराव्यात.

**३.** प्रस्तुत परिपत्रकामध्ये समावेशन परीक्षेसंबधी संक्षिप्त तपशिल दिलेला आहे. अर्ज करण्याची पध्दत, आवश्यक अर्हता, शुल्क, इत्यादींबाबतच्या सविस्तर तपशिलासाठी आयोगाच्या www.mpsc.gov.in या वेबसाईटवरील **उमेदवारांना सर्वसाधारण सूचना** मध्ये उपलब्ध करून देण्यात आलेल्या माहितीचे कृपया अवलोकन करावे. आयोगाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आलेली माहिती अधिकृत समजण्यात येईल. प्रस्तुत परिपत्रक आयोगाच्या वेबसाईटवर उपलब्ध आहे.

## ४. अर्ज करण्याची पद्धत :-

४.१ प्रस्तुत परीक्षेसाठी अर्ज फक्त ऑनलाईन पद्धतीने स्वीकारण्यात येतील. इतर कोणत्याही प्रकारे अर्ज स्वीकारण्यात येणार नाहीत.

४.२ पात्र उमेदवारांना वेब-बेस्ड (Web-based) ऑनलाईन अर्ज www.mahampsc.mahaonline.gov.in या वेबसाईटद्वारे **दि. ३ नोव्हेंबर, २०१५ ते दि. २३ नोव्हेंबर,२०१५** या कालावधीत सादर करणे आवश्यक राहिल.

४.३ ऑनलाईन पद्धतीने अर्ज सादर करण्याच्या सविस्तर सूचना आयोगाच्या www.mahampsc.mahaonline.gov.in तसेच, www.mpsc.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध आहेत.

४.४ विहित पद्धतीने अर्ज सादर केल्यानंतर परीक्षा शुल्क भरल्याशिवाय अर्ज विचारात घेतला जाणार नाही.

४.५ आयोगाने निश्चित केलेले परीक्षा शुल्क खालील पध्दतीने भरता येईल:-

१) भारतीय स्टेट बँकेमध्ये चलनाव्दारे २) नेट बँकिंग ३) डेबिट कार्ड ४) क्रेडीट कार्ड ५) संग्राम केंद्र/सीएससी (नागरी सेवा केंद्र)

४.६ **www.mahaonline.gov.in** येथे संग्राम केंद्र (ग्रामपंचायतीमध्ये) आणि सीएससीची सुची उपलब्ध आहे.

४.७ परीक्षा शुल्काचा भरणा करण्याकरीता उमेदवारांने खालील नमूद केलेल्या पध्दतीचा अवलंब करावा.

१) शुल्क भरण्याकरीता मुख्य पृष्ठाच्या डाव्या भागातील " माझे खाते" या लिंक वर क्लिक करावे.

२) " माझे खाते" या लिंक वर क्लिक केल्यानंतर उमेदवाराने अर्ज केलेल्या पदांची यादी शुल्क भरण्याच्या / न भरण्याच्या नोंदीसह सेल. ज्या पदासमोर 'Unpaid' असे लिहिले असेल त्या ठिकाणी 'Pay now' अशी लिंक उपलब्ध असेल.

३) **"Pay Now"** या लिंक वर क्लिक केल्यानंतर ३ पर्याय उपलब्ध होतील. १) ऑनलाईन पेमेंट २) नागरी सुविधा केंद्र ३) चलनाव्दारे.

(४) उमेदवार क्रेडीट कार्ड, डेबिट कार्ड अथवा नेट बँकिंग सहायाने ऑनलाईन पेंमेंट करू शकतील.

(५) नागरी सुविधा केंद्र हा पर्याय निवडल्यास, उपलब्ध होणाऱ्या पावतीची प्रत घेऊन नागरी सुविधा केंद्र किंवा सग्राम केंद्रात जाऊन शुल्काचा भरणा केला जाऊ शकतो. उपरोक्त कार्यवाही अर्ज सादर करण्याच्या अंतिम दिनांकापूर्वी पूर्ण करणे आवश्यक राहिल.

(६) उमेदवाराने चलनाव्दारे हा पर्याय निवडल्यास, उपलब्ध होणाऱ्या चलनाची प्रत घेऊन भारतीय स्टेट बँकेच्या कोणत्याही शाखेत, बँकेच्या कार्यालयीन वेळेत शुल्काचा भरणा केला जाऊ शकतो.

(७) ज्या उमेदवारांना भारतीय स्टेट बँकेमध्ये चलनाव्दारे शुल्क भरावयाचे आहे, असे उमेदवार अर्ज सादर केल्याच्या २ तासानंतर अथवा शेवटच्या दिवशी अर्ज सादर करणाऱ्या उमेदवारांनी त्या पुढील कामकाजाच्या दिवशी बँकेच्या कार्यालयीन वेळेत परीक्षा शुल्क भरणे आवश्यक आहे.

४.८ ऑनलाईन पध्दतीने अर्ज केल्यानंतर अर्जाची प्रत व सोबतच्या **परिशिष्ट - अ** ची छायांकित प्रत **दि.२ डिसेंबर,२०१५** पर्यंत शासनाच्या संबंधित विभागामार्फत आयोगास सादर करणे आवश्यक राहील.त्याशिवाय अर्ज विचारात घेतला जाणार नाही.

४.९ ऑनलाईन पध्दतीने अर्ज सादर केल्यानंतर संबंधित उमेदवारांनी अर्जाची प्रत त्यांच्या मूळ नियुक्ती व सहायक अभियंता श्रेणी-२ (यांत्रिकी) पदावरील नियुक्तीच्या प्रती , सेवापुस्तकातील पहिल्या पानाची व नियुक्तीच्या नोंदीची प्रत, मागासवर्गीय कर्मचाऱ्यांच्या बाबतीत जात वैधता प्रमाणपत्राची प्रत, शैक्षणिक अर्हतेचे प्रमाणपत्र, नियुक्ती आदेशाच्या प्रतीसह शासनाकडे विभागप्रमुखांच्या मार्फत तात्काळ सादर करावेत. **दि. २ डिसेंबर,२०१५** नंतर प्राप्त झालेले अर्ज विचारात घेतले जाणार नाहीत.

**मुलाखतीच्या वेळी उमेदवाराने मूळ प्रमाणपत्रांसह सोबतच्या परिशिष्ट अ प्रमाणे विहित नमुन्यात विभागप्रमुखांनी दिलेले प्रमाणपत्र आणणे सक्तीचे आहे .त्याशिवाय मुलाखतीस प्रवेश दिला जाणार नाही.**

४.१० विहित पध्दतीने अर्ज सादर करुन परीक्षा शुल्क भरण्याची , तसेच स्टेट बँकेमध्ये परीक्षा शुल्क भरण्याकरीता चलनाची प्रत घेण्याची कार्यवाही **दि. २३ नोव्हेंबर, २०१५ रोजी २३.५९ वाजेपर्यंत** पूर्ण करणे आवश्यक आहे. त्यानंतर सदर वेबलिंक बंद होईल.

**४.११** चलनाद्वारे परीक्षा शुल्क भरावयाचे झाल्यास भारतीय स्टेट बँकेमध्ये दि. २४ नोव्हेंबर, २०१५ पर्यंत बँकेच्या कार्यालयीन वेळेत भरणे बंधनकारक आहे. विहित दिनांकानंतर परिक्षा शुल्क

भरल्यास वैध मानले जाणार नाही. तसेच परीक्षा शुल्काचा परतावा ही केला जाणार नाही. विहीत दिनांकापर्यंत परीक्षा शुल्क भरण्याची कार्यवाही पूर्ण न केल्यास मुलाखतीस प्रवेश मिळू शकणार नाही.

**५. शुल्क :-**

(१) अमागासवर्ग-रू. ५२० /- (२) मागासवर्ग-रू. ३२० /-

६. प्रस्तुत सहायक अभियंता, श्रेणी-२ (यांत्रिकी) गट-ब पदाच्या सेवाप्रवेश नियमातील तरतूदीनुसार नियुक्तीसाठी पात्र असलेले अभियंते सदर मुलाखतीस पात्र असतील. नेमणूकीस पात्र असलेल्या अभियंत्यांनी मुलाखतीस स्वखर्चाने उपस्थित राहणे आवश्यक आहे. मुलाखतीस उपस्थित न राहणा-या अभियंत्याच्या अस्थायी नेमणूकांना आयोगाची मान्यता मिळणार नाही. तसेच अधिसूचना क्रमांक क्र.बीसीएस- १०८६/(१६७/८६)(भाग-२)/आ (सं. नि.), दिनांक ०४ एप्रिल, २०१३ अन्वये सदर मौखिक परीक्षा ही उमेदवारांची **प्रथम संधी** आहे याची नोंद घ्यावी.

**७.** प्रस्तुत पदाच्या मुलाखती मुंबई येथे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या ८ वा मजला, कुपरेज टेलिफोन निगम इमारत, महर्षि कर्वे मार्ग, कुपरेज, मुंबई-४०० ०२१ येथील कार्यालयात घेण्यात येतील. मुलाखतीचा दिनांक व वेळ संबंधितांना आयोगाकडून उमेदवारांच्या प्रोफाईलद्वारे उपलब्ध करुन देण्यात येईल. तसेच, याबाबतची माहिती संबंधित उमेदवारांना **ईमेल द्वारे** व **मोबाईलवर एसएमएस द्वारे** कळविण्यात येईल.

८. अर्जात नमूद केलेल्या माहितीच्या आधारे उमेदवार परिपत्रकातील विहित अर्हतेबाबतच्या अटींची पूर्तता करतात असे समजून पात्रता न तपासता आयोगाकडून त्यांना मुलाखतीस तात्पुरता प्रवेश दिला जाईल. परंतु मुलाखतीपूर्वी अथवा मुलाखतीनंतर कोणत्याही टप्प्यावर , उमेदवाराने अर्जात नमूद केलेली माहिती चुकीची वा खोटी असल्याचे अथवा उमेदवार विहित अर्हतेची पूर्तता करीत नसल्याचे आयोगास आढळल्यास अशा उमेदवारांची उमेदवारी कोणत्याही टप्प्यावर रद्द करण्यात येईल आणि त्याबाबतचा आयोगाचा निर्णय अंतिम राहील.

९. शासन अधिसूचना, जलसंपदा विभाग, क्रमांक क्र.बीसीएस-१०८६/(१६७/८६)/भाग-२/आ(संनि) दि.०४ एप्रिल २०१३मधील नियम १० (एच) मधील तरतुदीनुसार, संबंधित अभियंत्यांची आपापसातील जेष्ठता ठरविण्यात येईल.

**१०.** आयोगाचे अध्यक्ष , सदस्य किंवा अधिकारी यांच्यावर प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष दडपण आणण्याचा कोणताही प्रयत्न केल्यास अशा उमेदवारास आयोगाच्या निवडीपासून अपात्र ठरविण्यात येईल.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५११०४१७१८३०५९२७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने

Popat Gangaram Tande

Digitally signed by Popat Gangaram Tande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Popat Gangaram Tande
Date: 2015.11.04 17:25:01 +05'30'

**( पो.गं.तंडे)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान सचिव(जलसंपदा),जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. सचिव(ज.सं.व्य व लाक्षेवि),जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव(सेवा),सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय, मुंबई.
४. सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई.
५. मुख्य अभियंता(यांत्रिकी),जलसंपदा विभाग,नाशिक.
६. आ(तांत्रिक)/आ(वर्ग-२)/आ(संनि)/आ(वर्ग-१)कार्यासने,
७. आ(स.अ.श्रेणी-२)संग्रहार्थ.

(शासन परिपत्रक, जलसंपदा विभाग, क्र.नियुक्ती-२०१३/(प्र.क्र.६८/२०१३)/आ(स.अ.श्रेणी-२)
दि.०४.११.२०१५ सोबतचे सहपत्र

**परिशिष्ट - 'अ'**

**उमेदवाराच्या पात्रतेसंबंधी विभागप्रमुखांनी द्यावयाचे प्रमाणपत्र**

**प्रमाणपत्र**

प्रमाणित करण्यात येते की , श्री /श्रीमती / कु. ...................................... यांची जलसंपदा विभागात मूळ नियुक्ती * **कनिष्ठ अभियंता** या पदावर दिनांक . .................. झाली असून शासन आदेश / निर्णय क्रमांक ..............................................., दिनांक ..................अन्वये, त्यांना ३/८ सेवेचा लाभ देऊन सहाय्यक अभियंता श्रेणी -२ (यांत्रिकी) या पदाचा मानिव दिनांक ...................... असा देण्यात आला आहे. / * जलसंपदा विभागात **सहायक अभियंता श्रेणी -२ (यांत्रिकी)** या पदावर तदर्थ नियुक्ती आदेश क्रमांक ........................ दिनांक ........................ असा असून ते दिनांक .................... रोजी सेवेत रुजू झाले आहेत. (सोबत नियुक्ती आदेशाची प्रत जोडली आहे.)

२. शासन अधिसूचना क्रमांक बीसीएस - १०८६/(१६७/८६)(भाग-२) आ (सं.नि.), दिनांक ०४.०४.२०१३ अन्वये या कार्यालयाच्या उपलब्ध सेवा तपशीलानुसार सहाय्यक अभियंता श्रेणी -२ (यांत्रिकी) पदाच्या सुधारीत सेवा प्रवेश नियमानुसार श्री / श्रीमती ............................... महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मौखिक परिक्षेच्या **प्रथम संधीसाठी** पात्र आहेत.

३. शासकीय अभिलेख्यानुसार त्यांची जन्मतारीख ...................... आहे. आयोगाच्या जाहीरातीतील तरतूदीनुसार ते सन २०१४ -१५ ला वयाधिक होत असले तरी या पदाच्या सेवा प्रवेश नियमावलीतील नियम १० मधील तरतूदीनुसार कमाल वयोमर्यादेची अट शिथिल करुन ते सदर मौखिक परीक्षेस पात्र आहेत.

४. वरील माहिती सदर अभियंत्याच्या सेवा पुस्तकाच्या नोंदी व उपलब्ध अभिलेखावरुन तपासली असून ही माहिती बिनचूक आहे. तसेच त्यांचे गोपनीय अहवाल समाधानकारक आहेत.

* लागू नसेल ते खोडावे.

दिनांक :- स्वाक्षरी

ठिकाण :-

विभागप्रमुख
सही ,नांव व पदनाम